**डीएपी/युरिया/एनपीके खते आयात करुन राज्यातील शेतक-यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई यांना राष्ट्रीयकृत बँकेकडून घ्यावयाच्या रु.२६०.०० कोटी इतक्या कर्जास शासन हमी मंजूर करण्याबाबत.........**

**महाराष्ट्र शासन**

वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

शासन निर्णय क्रमांकः- शाहमी १०१०/सपवव/प्र.क्र.४२/अर्थबळ.

**दिनांक :- २/११/२०१०.**

**वाचा -** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी-१०९९/प्र.क्र.६८/शा.हमी, दिनांक ५/११/१९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी-१००८/प्र.क्र.१८/शा.हमी, दिनांक २८/४/२००८
३) व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई यांचे पत्र क्रमांक खत/डीएपी/संरक्षित साठा /२०१०-२०११/३०५, दिनांक ५/१०/२०१०.

**प्रस्तावनाः-**

रब्बी हगांम २०१०-११ साठी राज्यातील मागणीच्या तुलनेत खताच्या पुरवठ्यातील तूट भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या निर्देशानुसार केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या मे.इंडियन पोटॅश लिमिटेड,मे.इफको लि., झुआरी व आरसीएफ या खत कंपन्याकडून **डीएपी/युरीया /एनपीके खते** आयात करुन ते राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई यांची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. याप्रमाणे **२.०० लाख मे.टन डीएपी, ०.५० लाख मे.टन युरिया व ०.५० लाख मे.टन एनपीके खते** असे एकूण ३.०० लाख मे.टन खत आयातीत करुन, संरक्षित साठा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पण्न महासंघ मर्या. मुंबई यांना रु.२६०.०० कोटी ( रुपये दोनशे साठ कोटी फक्त) चे कर्ज द.सा.द.शे.८% व्याजदराने इंडियन बँकेकडून घेण्यासाठी महासंघाने प्रस्ताविलेले आहे. या प्रयोजनासाठी गठित केलेल्या मंत्रीमंडळ उपसमितीने दि.२४/८/२०१० रोजी घेतलेल्या निर्णयानुसार सदर कर्जाकरिता शासन हमी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील शेतकऱ्यांना वेळेवर खताचा पुरवठा करण्याकरिता २.०० लाख मे.टन डीएपी, ०.५० लाख मे.टन युरिया व ०.५० लाख मे.टन एनपीके खताची खत पुरवठादार कंपन्याकडे मागणी करण्याकरिता सध्याच्या आंतरराष्ट्रीय दराप्रमाणे रु.२६०.०० कोटी (अक्षरी रुपये दोनशे साठ कोटी फक्त) इतकी रक्कम पुरवठा करणा-या खत कंपन्यांना मागणी आदेशासह महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.मुंबई यांनी अदा करण्याची आवश्यकता आहे. सबब,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.मुंबई यांना **रु.२६०.०० कोटी (अक्षरी रुपये दोनशे साठ कोटी फक्त)** इतके कर्ज निविदा प्रक्रियेनुसार कमीत कमी व्याज दर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून शासन हमीवर घेण्यास मंजूरी देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. सदर निविदा प्रक्रिया अंतिमीकरणाची कार्यवाही मंत्रालयीन प्रशासकीय विभाग स्तरावर करावी. त्यानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या,मुंबई यांना निविदा प्रक्रियेनुसार कमीत कमी व्याज दर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून कर्ज घेण्यासाठी **रु.२६०.०० कोटी (अक्षरी रुपये दोनशे साठ कोटी फक्त)** इतक्या रकमेकरिता शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासन हमीवरील कर्ज रुपये २६०.०० कोटीपर्यंत आवश्यकतेनुसार उचलण्याची मुदत दिनांक ३१ मार्च, २०११ पर्यंत वैध राहील.

३. राष्ट्रीयकृत बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय किंवा करारनामा स्वाक्षरित करण्यापूर्वी बँकेने कर्ज संवितरित केल्यास शासन हमी अवैध ठरेल.

अ) राष्ट्रीयकृत बँके कडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचा वापर फक्त केंद्र शासनाच्या निर्देशानुसार व मंत्रिमंडळ उपसमितीने मान्यता दिल्याप्रमाणे डीएपी/ युरिया /एनपीकेखते आयातीत करुन, त्याच्या संरक्षित साठयाकरिताच करण्यात यावा.

ब) कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बँकेमध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेच्या नावे एक स्वतंत्र खाते (Escrow A/c)उघडण्यात यावे. उपरोक्त खात्यातून शासन हमीवर घेतलेले रु.२६० कोटी (रुपये दोनशे साठ कोटी फक्त) व त्यावरील व्याजापोटी बँकेला देय असलेली रक्कम खत विक्रीतून जमा झालेल्या रकमेतून बँकेने परस्पर तात्काळ कापून घ्यावी. तद्नंतर फक्त कर्जाच्या शिल्लक रकमेवर व्याजाची आकारणी बँकेने करावी.

क) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ने प्रचलित दराने डीएपी/ युरिया/एनपीके खताच्या पुरवठ्याची आगावू मागणी (Advance booking) नोंदविणाऱ्याकडून प्रथम खताच्या विक्री किंमतीच्या कमीत कमी २५% रक्कम वसुल करावी. अशा मागणीमुळे प्राप्त होणारी रक्कम सदर महामंडळाने उपरोक्त खात्यात जमा करावी. आयातीत डीएपी/ युरिया/एनपीके खताच्या उपलब्धते संबंधीची माहिती महामंडळाने मागणी नोंदविणाऱ्यांना द्यावी. तसेच खताच्या आयातीत डीएपी/ युरिया/एनपीके खताचा पुरवठा करता आला नाही तर योग्य त्या व्याजासह नोंदणीची रक्कम परत करण्यात येईल असेही त्यांना स्पष्ट करण्यात यावे.

ड) आयातीत डीएपी/ युरिया/एनपीके खताची विक्री तत्परतेने करण्यात यावी व विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम उपरोक्त स्वतंत्र खात्यात तत्परतेने जमा करण्यात यावी. आयातीत डीएपी/ युरिया/एनपीके खते राज्यात ज्या ठिकाणी प्राप्त होईल त्याचठिकाणी त्याची विक्री करण्यात यावी. इतर ठिकाणी, देशांतर्गत उपलब्ध असलेल्या डीएपी/ युरिया/एनपीके खताची विक्री करण्यात यावी.

इ) पणन महासंघाने शासनाच्या निर्देशाप्रमाणे खताच्या साठयाचा जास्तीत जास्त खप व्हावा यासाठी प्रयत्न करावेत.

ई) खताचा साठा संरक्षित ठेवण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांची राहील.

संबंधित कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बँकेने त्याबाबत वेळोवेळी खात्री करावी.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांचेकडून शासनास देय असलेल्या हमीशुल्काचा शासनास भरणा केल्याशिवाय संबंधित बँकेने कर्ज मंजूर / वितरित करु नये.

फ) राष्ट्रीयकृत बँक ही राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ला या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच सदर प्रयोजनासाठी पणन महासंघ इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

भ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई कडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची ९० दिवसांच्या आंत शासनास सूचना देणे राष्ट्रीयकृत बँक यांच्यावर बंधनकारक असेल.

म) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेकडील कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय राष्ट्रीयकृत बँकेला हमी पूर्तते करीता शासन हमीची प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. राष्ट्रीयकृत बँकेकडून शासन मान्यतेने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबईच्या चल/अचल मालमत्तेची विक्री/ लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग व वित्त विभाग यांचा प्रयेकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. चल/अचल मालमत्तेची विक्री/ लिलाव (Auction) करताना मूल्यांकन त्रयस्थ संस्थेकडून शासनाच्या मान्यतेने करणे आवश्यक राहील. तसेच लिलाव प्रक्रियेचे अंतिमीकरणास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

य) राष्ट्रीयकृत बँकेच्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या व्याज, दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

र) राष्ट्रीयकृत बँक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल सोबत जोडलेल्या **प्रपत्र-अे** मध्ये शासनास दर सहा महिन्यानी (दिनांक ३१ मार्च /३० सप्टेंबर) सादर करील.

ल) नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

वरील (अ) ते (ल) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबईसाठी रु.२६० कोटीची (अक्षरी रुपये दोनशे साठ कोटी फक्त) हमी अ.क्र.१ येथील शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक ५ नोव्हेंबर,१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी आणि खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई हे Principal Debtor राहतील.

ब) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ने राष्ट्रीयकृत बँकेकडून उपलब्ध होणाऱ्या कर्जाबाबत आढावा घेऊन त्यासंबंधीच्या वित्तीय मर्यादा शासनाकडून निश्चित करुन घ्याव्यात.

क) राष्ट्रीयकृत बँकेकडून घेतलेल्या कर्जाचा वापर महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांना शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रयोजनाकरिता करता येणार नाही.

ड) आयातीत डीएपी/ युरिया/एनपीके खताची विक्री महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ने रोखीने करावी.

ई) राष्ट्रीयकृत बँकेने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई ला मंजूर केलेल्या कर्जाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्ज फेडीच्या शेवटच्या हप्त्याच्या दिनांकास हमी संपुष्टात येईल. सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या विहित कालावधीसाठीच शासन हमी लागू राहील. या कालावधीनंतर संबंधित राष्ट्रीयकृत बँकेला शासन हमी आवाहनीत करता येणार नाही.

फ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबईने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहीती सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग / वित्त विभागाकडे सादर करावी.

ग) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबईने विहीत कार्यपध्दतीने लेखा परिक्षीत केलेल्या व संस्थेने मान्य केलेल्या संस्थेच्या लेख्याची एक प्रत शासनास सादर करावी.

५. **हमी शुल्क**

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबईला प्र.श.प्र.व.हमीशुल्काचा दर रु.२/- असा राहील. हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (Total maximum outstanding amount) देय राहील. Escrow Account मधून पणन महासंघाकडून हमीशूल्काचा भरणा प्रथमतः करण्यात यावा.

ब) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि /अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल आणि /अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

क) हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकीत हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकीत हमी शुल्काची वसुली, त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या हमी शुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

ड) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महासंघाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

इ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई ने शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांनी महासंघाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

ई) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क राष्ट्रीयकृत बँक शासनाकडे भरणा करेल व महासंघाकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र.सपस १०१०/प्र. क्र.१६२/२४-स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.२/२०१०-२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई समवेत कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा **सांकेतांक क्रमांक२०१०११०२१८२५३९००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( मीनल पेडणेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

२१११२०१०

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
६) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) ग्रथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
९) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई,

१०) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०,

११) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भुवन, एस.व्ही.पटेल रोड,मुंबई-४०० ००४,

१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३,

१३) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५,

१४) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२१,

१५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८,

१६) प्रधान सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

१७) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या.कन्मुर हाऊस, नरसीनाथा स्ट्रीट, मसजिदबंदर, मुंबई - ४०० ००९.

१८) वित्त विभाग (साउ /व्यय /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.

१९) कार्यासन अधिकारी,२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२,

२०) राष्ट्रीयकृत बँक, मुंबई

२१) निवड नस्ती -अर्थबळ.

9081

ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending Institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| 9 Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| 10. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| 11. Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| 12. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| 13. If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| 14. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| 15. Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |

------